सांकेतिक क्रमांक - २०१४१२०११२५८१३४७२८

नागझरी साठवण तलाव, ता.अहमदपूर, जि.लातूर या योजनेस सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
शासन निर्णय क्र. लपात २१११/(५६२/११)/लपा-२
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक १४/०६/२०१२

**पहावे** : १) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ यांचे पत्र क्र. गोमपाविम/ता-४/१०५३२, दि. २१.१०.२०११

**प्रस्तावना :**

नागझरी साठवण तलाव, ता. अहमदपूर, जि. लातूर या योजनेस गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ यांचा निर्णय क्र. गोमपाविम/ता-४/प्रमा/नागझरी सा.त./२१, दि.२२.५.२००६ अन्वये एकूण अंदाजित खर्च रु. ३२०.०९५ लक्षच्या किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. हा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव तयार करतांना सन २००३-२००४ च्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले होते. मध्यंतरीच्या काळात योजनेच्या खर्चात दरसूचीतील फरकामुळे, जास्त दराची निविदा स्वीकृती, भूसंपादन किंमतीतील झालेली वाढ, संकल्पचित्रातील बदल इत्यादी कारणांमुळे वाढ होत असल्यामुळे योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे आवश्यक झाले आहे.

**शासन निर्णय**

आता या निर्णयान्वये नागझरी साठवण तलाव ता.अहमदपूर, जि.लातूर या योजनेच्या एकूण अंदाजीत खर्च रुपये ५९८.७७ लक्ष (रु.पाच कोटी, अठ्यान्नव लक्ष, सत्याहत्तर हजार, फक्त) या किंमतीस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. अंदाजपत्रकात उर्वरित कामासाठी सन २००९-२०१० या वर्षाच्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले आहेत. उपशिर्षवार तरतुदींचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये जोडला आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५,"४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च ८०-सर्वसाधारण (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (००) (०४) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ भाग भांडवली अंशदान योजनांतर्गत, संगणक सांकेतांक क्र. ४७०२ ४९९ २" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**ठळक बाबी**

अ) या योजनेचे सिंचन क्षेत्र २९२ हेक्टर आहे.

ब) या योजनेमुळे एकूण होणारा पाणीसाठा १४५८.२० सघमी. आहे.

क) प्रति सहस्त्र घनमीटर पाणीसाठा किंमत रु. ४१,०६२/-

ड) लाभव्यय गुणोत्तर १.१८ (अवर्षण प्रवण क्षेत्रातील योजना)

हा निर्णय पाटबंधारे व वीज विभाग क्रमांक एपीएच/१०७२/३३५४६ (ई-३) दि.१७.७.७४ मधील परिशिष्ट क्रमांक २ (अ) नुसार व नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.५७७/१४३४, दि.१२/३/२०१२ अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १०२/व्यय-१२, दि. २.६.२०१२ अन्वये दिलेल्या मंजुरीनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकिय मान्यता (१३/२०१२) अनुक्रमांकावर नोंदण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( प्र. र. कुलकर्णी )
शासनाचे अवर सचिव

**प्रतिलिपी.**

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३२
नियोजन विभाग (कार्यासन १४ ४), मंत्रालय, मुंबई ३२.
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद
(सोबत सुधारित प्रशासकीय मान्यतेची परिनिरीक्षण टिप्पणी जोडली आहे)
आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
अधीक्षक अभियंता, बीड पाटबंधारे प्रकल्प मंडळ,परळी वैजनाथ
कार्यकारी अभियंता, लातूर मध्यम प्रकल्प विभाग, लातूर
अर्थशाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
लपा-१ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, लातूर
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. (२ प्रती)
लपा-२, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक : लपात २१११/(५६२/२०११)/लपा-२, दि. १४/०६ /२०१२ चे

* परिशिष्ट

नागझरी साठवण तलाव ता.अहमदपूर, जि.लातूर

उपशिर्षनिहाय तरतूदी

| क्र. | उपशिर्ष | रक्कम (लक्ष) |
|---|---|---|
| १ | 'ए' प्राथमिक | २.५० |
| २ | 'बी' भूसंपादन | ११९.८३ |
| ३ | 'सी' मुख्य कामे | ४०६.५१ |
| ४ | "डी" विमोचक | --- |
| ५ | 'के' इमारत | १.०० |
| ६ | 'ओ' किरकोळ कामे | ०.५० |
| ७ | 'पी' व्यवस्थापन | ०.५० |
| ८ | 'आर' दळणवळण | २४.२९ |
| ९ | 'एम' वृक्षरोपन | ०.१० |
| | एकुण | ५५५.२३ |
| | आनुषंगिक खर्च | ४३.५४ |
| | **योजनेची एकूण किंमत (रु.लक्ष)** | ५९८.७७ |